महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेच्या माध्यमातून झालेल्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन सहायक अनुदान वितरित करणेबाबत- सन २०२१-२२ (कार्यक्रमांतर्गत)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मधोसं-२०२१/प्र.क्र.२५/२०२१/१२-अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० मार्च, २०२२

वाचा :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मधोसं-२०१७/प्रक्र.४/-२०१७/१२-अ दि.७ जूलै,२०१७.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मधोसं-२०१७/प्रक्र.१७३/-२०१७/१२-अ दि.१६ नोव्हेंबर,२०१७.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मधोसं-२०१७/प्रक्र.१७३/-२०१७/१२-अ दि. २४ एप्रिल, २०१८.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.६ एप्रिल, २०२१.
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-०२१/प्र.क्र.८९/२०२१/२५, दि.८ एप्रिल, २०२१.
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१.
७. संचालक, महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था यशदा पुणे यांचे .यशदा / मधोधंस-२०१६/०२/ २०२०-२१ दि.२९.७.२०२१
८. सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.२८ जानेवारी २०२२.
९. संचालक, महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था यशदा पुणे यांचे मधोधंस-२०१६/०२/२०२०-२१ दि.१०.२.२०२२

**प्रस्तावना :-**

राज्यात लागू असलेली धोरणे योजना व कार्यक्रम यांचे नियमित मुल्यमापन करणे,धोरणात्मक परिक्षणासाठी धोरण संशोधन करणे, धोरणात्मक पर्यायांचा तौलनिक अभ्यास करुन सर्वाधिक उपयुक्त पर्याय निवडणे आणि प्रशिक्षणाद्वारे प्रशासकीय सुधारणांना चालना देण्यास्तव जागतिक मानांकनाची महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था यशदा, पुणे या शिखर संस्थेच्या माध्यमातून स्थापन करण्यास संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था ही योजनांची योजना म्हणून राबविण्यात येणार आहे. या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१.२ (ई) नुसार संदभार्धीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये कामकाज सल्लागार समितीवर अध्यक्षाची नियुक्ती करण्यात आली. तसेच संदर्भाधीन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये सदर कामकाज सल्लागार समितीची पुनर्रचना करण्यात येऊन सदर समितीवर तज्ञ सदस्याची नियुक्ती करण्यात आली आहे.

२. त्याचप्रमाणे, प्रारंभिक टप्प्यात ते कार्य यशदा, पुणे या संस्थेतील धोरण संशोधन केंद्रामार्फत पार पाडण्याकरिता वार्षिक रु.५.०० कोटी पर्यंत निधी देण्याचे निश्चित झाले आहे. त्यास अधिन राहून या योजनेकरिता संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी रु.५.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

३. यशदा पुणे यांनी संदर्भाधीन क्र.७ व ९ च्या पत्रान्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील झालेल्या खर्चाचे प्रलंबित देयक व सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात झालेला खर्च या अनुषंगाने अनुक्रमे रु.१.२६ लाख व रु. १.२४ लाख असे एकूण रु.२.५० लाख इतक्या निधीची मागणी केली आहे. त्यानुसार यशदा पुणे यांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेमार्फत महाराष्ट्र धोरण संशोधनाच्या विविध बाबींवर खालीलप्रमाणे सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील प्रलंबित देयक रु. १.२५ लाख ( रुपये एक लाख, पंचवीस हजार फक्त ) व सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात झालेल्या कार्यालयीन खर्चाकरिता रु. १.२४ लाख ( रुपये एक लाख, चोवीस हजार फक्त ) असे एकूण **रु. २.४९ ( रुपये दोन लाख, एकोणपन्नास हजार फक्त )** सन इतक्या रक्कमेस वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून, तसेच नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन यशदा पुणे या संस्थेस सहायक अनुदान म्हणून वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | खर्चाची बाब सन २०२०-२१ | रक्कम |
|---|---|---|
| १ | जलद अभ्यास संशोधन प्रकल्प सन २०२०-२१ मधीलउर्वरित काम | रु.३०,०००/- |
| २ | संशोधन तज्ञांचे मानधन ( माहे जानेवारी २०२१ ते मार्च २०२१ ) | रु.९०,०००/- |
| ३. | कार्यालयीन खर्च | रु.५०००/- |
| | **एकूण** | **रु.१,२५,००० /-** |

| अ.क्र. | खर्चाची बाब सन २०२१-२२ | रक्कम (रु) |
|---|---|---|
| १ | **सल्लागार मानधन : सार्वजनिक धोरण क्षेत्रातील राज्य, देश व जागतिक पातळीवरील संस्थांचा तुलनात्मक अभ्यास ( Desk Review ) / धोरण व संशोधन अहवालामध्ये एकांगता राहण्याकरिता आदर्श प्रारुप ( Model Template / style guide ) व अनुषंगिक संशोधन कार्यासाठी तीन कालावधीकरिता TOR तत्वावर मानधन** | **रु.९०,०००/-** |
| २ | **तांत्रिक सहाय्य मानधन : मधोसंसं सल्लगार समितीच्या शिफारशींच्या अधारे यशदा नियामक मंडळाच्या ४९ व्या बैठकीतील निर्णयानुसार संस्थेच्या नोंदणीसाठी Memorandum of Association, Deed of Trust व अनुषंगिक दस्तावेज तयार करण्याकरिता तांत्रिक सल्लागाराचे मानधन** | **रु.३०,०००/-** |
| ३ | **प्रशासकीय व किरकोळ खर्च** | **रु.४०००/-** |
| | **एकूण** | **रु.१,२४,०००/-** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक क्र. ए-४ मुख्य लेखा शीर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण - राज्य २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ००३, प्रशिक्षण (००) (००) ( १३ ) महाराष्ट्र धोरण संशोधन संस्थेकरिता यशदास सहायक अनुदान ( कार्यक्रम ) २०७०A०११, ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) लाख या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. यशदा, पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या सहायक अनुदानाची रक्कम **रु. २.४९ लाख (रुपये दोन लाख, एकोणपन्नास हजार फक्त)** आहरित करावी.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

५. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा - महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

६. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनुक्रमे अनौसंदर्भ क्र.२३६ /१४४३ दि. १५.१२.२०२१ व ९३/ २०२२/ व्यय -४ , दि. २५.२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१०१४४९४३६७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Leena Ashish Sankhe

Digitally signed by Leena Ashish Sankhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, serialNumber=783ca3332598c7e1c28393ea543fa05d9fb77f36a848f4738d12288e105699f4, cn=Leena Ashish Sankhe
Date: 2022.03.10 14:51:41 +05'30'

**( लिना संखे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा(, महाराष्ट्र१-, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, नागपूर
३. महासंचालक, यशदा, पुणे.
४. संचालक, महाराष्ट्र धोरण संशोधन संस्था, यशदा पुणे
५. लेखाधिकारी, यशदा, पुणे. (२ जादा प्रतींसह).
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. उप कोषागार कार्यालय, पुणे.
८. नियोजन विभाग,कार्यासन १४४३, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
९. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मुंबई - ३२.
१०. निवडनस्ती - कार्यासन १२-अ.